"श्री. गुरू गोविंद सिंगजी अभियांत्रिकी व तंत्रशास्त्र संस्था, नांदेड या संस्थेतील नियामक मंडळावरील अध्यक्षांची नियुक्ती होईपर्यंत वित्तीय व्यवहारांसंबंधी तात्पुरता बदल करणेबाबत..

# महाराष्ट्र शासन

## उच्च व तंत्र शिक्षण विभाग,

## शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-१११९/(९१/२१)/तांशि-२

मंत्रालय विस्तार इमारत, हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई -४०००३२
दिनांक : २१ सप्टेंबर, २०२१

**संदर्भ :**

१. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक WBP-२००१/(४७/०१)/VE-५, दिनांक १९ जून, २००२
२. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक TEQIP-२०१०/(०२/१०)/तांशि-२, दिनांक ३१ मे, २०११
३. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक बैठक - २०१०/(१७०/१०)/तांशि-२, दिनांक २३ ऑक्टोबर, २०१२
४. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक संकीर्ण २०१३/(१२९/१३)/तांशि-२, दिनांक ०७ मार्च, २०१९
५. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक संकीर्ण १११९/(०२/२०)/तांशि-२, दिनांक १० जानेवारी, २०२०
६. संचालक, श्री. गुरू गोविंद सिंगजी अभियांत्रिकी व तंत्रशास्त्र संस्था, नांदेड यांचे पत्र क्र. एसजीजीएस आयइटी/वित्तीय अधिकार/२०२१/५१९, दिनांक ०१ मे, २०२१
७. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. १७/तंशिसं /२०२१/५६, दिनांक १२ जुलै, २०२१

**प्रस्तावना**

देशातील तंत्रशिक्षण प्रणालीमध्ये गुणात्मक बदल करून त्याद्वारे भारतीय संस्थांमधून जागतिक दर्जाचे अभियंता तयार करून भारताला एक विकसित व आत्मविश्वासी राष्ट्र बनविणे या उद्दिष्टाकरिता -तंत्रशिक्षणाचा दर्जा सुधार कार्यक्रम◦ राबविण्यास भारत सरकारने मान्यता दिली. सदर कार्यक्रमांतर्गत राज्यात जागतिक बँक साहाय्यित केंद्र शासन पुरस्कृत "तंत्रशिक्षणाचा दर्जा सुधार कार्यक्रम टप्पा-१" (TEQIP-I) राज्यात राबविण्यासाठी संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच, संदर्भ क्र २ येथील शासन निर्णयान्वये जागतिक बँक सहाय्यित केंद्र शासन पुरस्कृत तंत्रशिक्षणाचा दर्जा सुधार कार्यक्रम टप्पा दुसरा राबविण्यास राज्य शासनाद्वारे मान्यता देण्यात आलेली आहे.

२. शासन निर्णय दिनांक १९ जुलै, २००२ व दिनांक २३ ऑक्टोबर, २०१२ अन्वये तंत्रशिक्षणाचा दर्जा सुधार कार्यक्रमांतर्गत समाविष्ट संस्थांमध्ये दैनंदिन कामकाजासाठी उपरोक्तप्रमाणे "नियामक मंडळ" स्थापन करण्यात येते. श्री. गुरुगोविंद सिंगजी इन्स्टिटयुट ऑफ इंजिनियरिंग ॲन्ड टेक्नॉलॉजी, नांदेड या संस्थेचे "नियामक मंडळ" दिनांक ०७/०३/२०१९ च्या शासन निर्णयान्वये गठित करण्यात आले होते. तथापि, संदर्भ क्र. ५ येथील शासन निर्णयान्वये, स्वायत्त शासकीय व

अनुदानित महाविद्यालयातील नियामक मंडळावरील राज्य शासनाद्वारे नियुक्त अशासकीय सदस्यांच्या (अध्यक्ष व २ सदस्य) नियुक्त्या रद्द करण्यात आलेल्या आहेत. सदरहू स्वायत्त शासकीय व अनुदानित महाविद्यालयातील नियामक मंडळावरील राज्य शासनाद्वारे नियुक्त अशासकीय सदस्यांच्या (अध्यक्ष व २ सदस्य) नियुक्त्या रद्द केल्यानंतर नव्याने अध्यक्ष व सदस्यांची नियुक्तीसंदर्भातील कार्यवाही शासन स्तरावर सुरू आहे.

३. श्री. गुरू गोविंद सिंगजी अभियांत्रिकी व तंत्रशास्त्र संस्था, नांदेड या स्वायत्त संस्थेच्या नियामक मंडळाच्या दिनांक ०९ ऑक्टोबर, २००४ रोजीच्या बैठकीत संमत ठरावानुसार, रू. २ लाखांपर्यंतचा खर्च व धनादेशावर स्वाक्षरीचे अधिकार संचालक आणि सचिव यांना प्रदान करण्यात आले होते. तसेच, रू. २ लाखांवरील खर्चाकरिता "वित्त समिती" ची मान्यता आवश्यक आणि धनादेशावर स्वाक्षरीचे अधिकार संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय आणि संस्थेचे संचालक यांना संयुक्तपणे प्रदान करण्यात आले होते. तद्नंतर, संस्थेच्या ०४ ऑगस्ट, २०१७ रोजीच्या बैठकीत मान्य करण्यात आलेल्या ठरावानुसार, रू. १० लाखापेक्षा जास्त जास्त खर्चाकरिता धनादेशावर (वेतन देयके वगळून) स्वाक्षरी करण्याचे अधिकार नियामक मंडळाचे अध्यक्ष व सचिव यांना संयुक्तपणे प्रदान करण्यात आले आहेत.

तथापि, नियामक मंडळावरील अध्यक्षांची नव्याने नियुक्ती अद्याप करण्यात आली नसल्याने श्री. गुरू गोविंद सिंगजी अभियांत्रिकी व तंत्रज्ञान संस्थेतील जिल्हा वार्षिक योजनेंतर्गत मंजूर "रोबोट प्रशिक्षण केंद्र स्थापन करणे" या कामाचे पुरवठादाराचे एकूण १.१८ कोटी रकमेचे देयक अदा करण्याकरिता अडचण निर्माण झाली आहे. यास्तव, श्री. गुरू गोविंद सिंगजी अभियांत्रिकी व तंत्रशास्त्र संस्था, नांदेड या संस्थेतील रू. १० लाखांवरील खर्चाकरिता धनादेश पारित करण्याच्या कार्यपद्धतीत तात्पुरता बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

श्री. गुरू गोविंद सिंगजी अभियांत्रिकी व तंत्रशास्त्र संस्था, नांदेड या संस्थेतील नियामक मंडळावरील अध्यक्षांची नव्याने नियुक्ती होईपर्यंत रू. १० लाखांपेक्षा अधिक खर्चाकरिता धनादेश पारित करण्याचे अधिकार संचालक, तंत्र शिक्षण, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य व संचालक, श्री. गुरू गोविंद सिंगजी अभियांत्रिकी व तंत्रशास्त्र संस्था, नांदेड यांना संयुक्तपणे प्रदान करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१०९२११६४६३८६९०८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Satish Jagdeorao Tidke

Digitally signed by Satish Jagdeorao Tidke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=abbed596652773468508d937a99472988ebdda28db8c543b79abe527c99646f6, serialNumber=bedb6cd16bd8fbd810e0a53f2b92ce7fd9ab37dd50427e28109cbb133f9887d3, cn=Satish Jagdeorao Tidke
Date: 2021.09.21 16:49:55 +05'30'

**( सतिश तिडके )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री/ राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-०१.
५.. विभागीय सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, औरंगाबाद.
६. संचालक, श्री. गुरू गोबिंद सिंघजी अभियांत्रिकी व तंत्रशास्त्र संस्था, विष्णूपुरी, नांदेड
७. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
८. महालेखापाल (लेखा परिक्षा)-१/, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
९. संचालक, लेखा व कोषागारे,
१०. अभिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
११. कार्यासन अधिकारी, तां.शि.-१, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. कार्यासन अधिकारी, तां.शि.-७, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती, तांशि-२, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.